**अपंग विदयार्थ्यांच्या शिष्यवृत्तीमध्ये मागासवर्गीय**
**विद्यार्थ्यांच्या धर्तीवर सुधारणा करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अपंग- २०१३/ प्र.क्र. ९१/ अ.क.२**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा रोड

हुतात्मा राजगुरुचौक, मुंबई -३२

तारीख: **३० ऑगस्ट, २०१४**

वाचा —

१) **शासन निर्णय क्रमांकः** समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक :- इडीडी- १२८८/ ३७०५१/के.नं.३०९/ सुधार -२, दि.९.८.१९९०

२) **शासन निर्णय क्रमांकः** , समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक :- इडीडी- २००३/ प्र.क्र.७०/ सुधार -२, दि.१५.११.२००३

३) **शासन निर्णय क्रमांकः** समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक :- इडीडी- २००३/ प्र.क्र.७१/ सुधार -२, दि.१५.११.२००३

प्रस्तावना —

राज्यामध्ये शालांतपूर्व व शालांत परिक्षोत्तर शिक्षण घेणाऱ्या अपंग विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या शिष्यवृत्तीचे दर संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेले आहेत. त्यास जवळपास १० वर्षाचा कालावधी होऊन गेला आहे.अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या शिष्यवृत्तीच्या दरामध्ये सन २०११ मध्ये सुधारणा करण्यात आली आहे. त्याच धर्तीवर अपंग विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या शिष्यवृत्तीमध्ये वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय—

शालांतपूर्व व शालांत परिक्षोत्तर शिक्षण घेणाऱ्या अंध, अशंत: अंध, कर्णबधीर, अस्थिविकलांग, मतिमंद, मानसिक आजार व कुष्ठरुग्णमुक्त अपंग विद्यार्थ्यांना सद्य:स्थितीत देण्यात येणाऱ्या शिष्यवृत्तीमध्ये अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्याना देण्यात येणाऱ्या शिष्यवृत्तीच्या धर्तीवर खालील प्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे:-

**(अ) शालांतपूर्व** :-

अपंग विद्यार्थ्यांना संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयानुसार सध्या देण्यात येणाऱ्या शिष्यवृत्तीच्या दरामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे -:

| अ.क्र. | अपंगत्वाचा प्रकार | इयत्ता | शिष्यवृत्तीचे सध्याचे दर (दरमहा) (रुपये) | शिष्यवृत्तीचे सुधारित दर (दरमहा) (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | अंध, अंशतः अंध, अस्थिविकलांग, कुष्ठरुग्णमुक्त | १ ली ते ४ थी | ५०/- | १००/- |
| २ | कर्णबधीर | पायरी वर्ग ते ४ थी | ५०/- | १००/- |
| ३ | मतिमंद व मानसिक आजार | नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त मतिमंदांच्या विशेष शाळांतील १८ वर्षापर्यंतचे विद्यार्थी | ७५/- | १५०/- |
| ४ | अंध, अंशतः अंध, अस्थिविकलांग, कर्णबधीर, कुष्ठरुग्णमुक्त | ५ वी ते ७ वी | ७५/- | १५०/- |
| ५ | अंध, अंशतः अंध, अस्थिविकलांग, कर्णबधीर, कुष्ठरुग्णमुक्त | ८ वी ते १० | १००/- | २००/- |
| ६ | अपंगांच्या कार्यशाळेतील प्रशिक्षणार्थी | --- | --- | ३००/- |

**(ब) शालांत परिक्षोत्तर :-**

अपंग विद्यार्थ्यांना संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयानुसार सध्या देण्यात येणाऱ्या निर्वाह भत्त्याच्या दरामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे -:

अ) **निवासी विद्यार्थी:- (निर्वाह भत्त्याचे दर)**

| **अ.क्र.** | **अभ्यासक्रमाचा गट** | **सध्याचे दर (दरमहा) (रुपये)** | **सुधारित दर (दरमहा) (रुपये)** |
|---|---|---|---|
| १ | गट-अ | ४२५/- | १२००/- |
| २ | गट-ब | २९०/- | ८२०/- |
| ३ | गट-क | २९०/- | ८२०/- |
| ४ | गट-ड | २३०/- | ५७०/- |
| ५ | गट-इ | १५०/- | ३८०/- |

**ब) अनिवासी विदयार्थी:- (निर्वाह भत्त्याचे दर)**

| **अ.क्र.** | **अभ्यासक्रमाचा गट** | **सध्याचे दर (दरमहा) (रुपये)** | **सुधारित दर (दरमहा) (रुपये)** |
|---|---|---|---|
| १ | गट-अ | **१९०/-** | **५५०/-** |
| २ | गट-ब | **१९०/-** | **५३०/-** |
| ३ | गट-क | **१९०/-** | **५३०/-** |
| ४ | गट-ड | **१२०/-** | **३००/-** |
| ५ | गट-इ | **९०/-** | **२३०/-** |

२. शालांत परिक्षोत्तर योजनेचा लाभ राज्यातंर्गत व राज्याबाहेरील देशांतर्गत शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अंध, अशंत: अंध, कर्णबधीर, अस्थिविकलांग, मतिमंद, मानसिक आजार, कुष्ठरोगमुक्त अपंग विद्यार्थ्यांना देण्यात येईल.

३. वरील सुधारित दराव्यतिरिक्त सदर योजनेच्या इतर अटी व शर्ती हया उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ व ३ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार कायम राहतील.

४. वरीलप्रमाणे सुधारित दर चालू शैक्षणिक वर्षापासून (सन २०१४-१५) लागू राहतील.

५. उपरोक्त प्रमाणे सुधारित दराने शिष्यवृत्तीवरील खर्च हा, सध्या ज्या लेखाशिर्षातून शालांतपूर्व व शालांत परिक्षोत्तर शिष्यवृत्ती अदा करण्यात येते, त्या संबंधित लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ मधील मंजूर तरतूदीतून करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४२/व्यय-१४, दि. ४.३.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८३०१२१७५५९३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pratap Pandurang Lubal

Digitally signed by Pratap Pandurang Lubal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pratap Pandurang Lubal
Date: 2014.09.06 13:56:35 +05'30'

**(प्र पां. लुबाळ)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

४. सर्व मंत्री / राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

५. मा.विरोधी पक्षेनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधान भवन, मुंबई,

६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई,

७. मा. मुख्य सचिव यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

८. आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे

९. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण ,

१०. सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद

११. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (सर्व जिल्हे),

१२. समाज कल्याण अधिकारी, बृहन्मुंबई

१३. महालेखापाल, महाराष्ट्र -१ /२ (लेखा लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर

१४. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर

१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

१७. सर्व जिल्हा कोषाधिकारी ,

१८. वित्त विभाग ( का. व्यय-१४), मंत्रालय, मुंबई

१९. कार्यासन अर्थसंकल्प, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई,

२०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीसाठी)

२१. निवड नस्ती, का- अ.क.२